केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०२४-२५ च्या राज्यशासनाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना जुलै, २०२४ ते सप्टेंबर २०२४ या कालावधीतील मानधन रु.२४८१६.९० लक्ष व माहे नोव्हेंबर, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावाधीतील वाढीव दरानुसार थकबाकी मानधन रु.१९००८.७५ लक्ष असे एकुण रु.४३८२५.६५ लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आशा-५६२४/प्र.क्र.२२७/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२४

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४

२) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआअ/राज्य शासन-निधी/माहे जुलै, २४ ते मार्च, २५ /प्रस्ताव/४१६३६-६४०/२०२४, दिनांक ३०/०७/२०२४.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत राज्यात आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक कार्यरत आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व दराप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडयात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना राष्ट्रीय आरोग्य अभियानात नेमून दिलेल्या एकूण ५८ सेवा केल्यास त्या सेवेस केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे प्रोत्साहनात्मक मोबदला दिला जातो. तथापि, राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रम व इतर राष्ट्रीय आरोग्य विषयक कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक हया दोन्ही घटकांच्या भूमिका महत्वाच्या असल्यामुळे सदर कामांकरीता त्यांना दिनांक १७ जुलै, २०२०, ०९ सप्टेंबर, २०२१ व दि.१० एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रत्येकी रु.५०००/- व ६२००/- इतका वाढीव मोबदला देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच दिनांक १४/०३/२०२४ च्या शासन निर्णयान्वये आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांच्या मानधनात अनुक्रमे रु.५०००/- व रु.१०००/- इतका वाढीव मोबदला देण्याचा निर्णय घेण्यात

आलेला आहे. आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात रु. ३२८६७.९९ लक्ष व सन २०२४-२५ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये मंजुर रु.८५४०८.४६ लक्ष असे एकुण रु.११८२७६.४५ लक्ष इतके अनुदान राज्य शासनाकडून मंजूर झाले असून सदर मंजूर तरतूदीमधून माहे जुलै, २०२४ ते मार्च, २०२५ या ९ महिन्याचे रु.१०,०००/- व रु.७,२००/- इतक्या दराने मासिक तत्वावर मानधन अदा करण्याकरीता रु.७४४५०.७० लक्ष व माहे नोव्हेंबर, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीतील अनुक्रमे वाढीवर दर रु.५०००/- व रु.१०००/- दराने देय असलेली थकबाकी मानधन रु.१९००८.७४ लक्ष असे एकुण रु.९३४५९.४५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मंजुरी देण्याबाबत वित्त व नियोजन विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने वित्त विभागाने आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांना मानधन अदा करण्याकरीता माहे जुलै, २०२४ ते सप्टेंबर, २०२४ या ३ महिन्याच्या कालावाधीकरीता रु.२४८१६.९० लक्ष व माहे नोव्हेंबर, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीतील रु.५०००/- व रु.१०००/- इतक्या वाढीव दराने थकबाकी मानधन अदा करण्याकरीता रु.१९००८.७५ लक्ष असे एकुण रु.४३८२५.६५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने रु.४३८२५.६५ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तक यांना मोबदला अदा करण्यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात रु. ३२८६७.९९ लक्ष व सन २०२४-२५ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये मंजुर रु.८५४०८.४६ लक्ष असे एकुण रु.११८२७६.४५ लक्ष इतकी तरतूद राज्यशासनाने अर्थसंकल्पीत केलेली आहे. सदर मंजूर तरतुदीतून आशा स्वयंसेविका व गटप्रवर्तकांना मानधन अदा करण्याकरीता माहे जुलै, २०२४ ते सप्टेंबर, २०२४ या ३ महिन्याच्या कालावाधीकरीता रु.२४८१६.९० लक्ष व माहे नोव्हेंबर, २०२३ ते मार्च, २०२४ या कालावधीतील रु.५०००/- व रु.१०००/- इतक्या वाढीव दराने थकबाकी मानधन अदा करण्याकरीता रु.१९००८.७५ असे एकुण रु.४३८२५.६५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने रु.४३८२५.६५ लक्ष इतके अनुदान रक्कम लेखाशिर्ष २२१०H०१५ मधून वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी

यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद सन २०२४-२५ (मुळ + पुरवणी मागणी) | मागणी रक्कम (राज्य हिस्सा) |
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; १०१-रोग प्रतिबंध आणि नियंत्रण ०२-किमान गरजा कार्यक्रम (०२) (०१) आशा स्वयंसेविका व आशा गटप्रवर्तक यांना प्रोत्साहन (कार्यक्रम) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०H०१५ | ११८२७६.४५ | ४३८२५.६५ |

४. वित्त विभागाच्या दिनांक २५ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २५ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

७. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

८. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २५ जुलै, २०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

९. सदर अनुदान बिनशर्त आहे.

१०. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५५/१४७२, दिनांक ०६/०८/२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३७/२०२४/व्यय-१३ दिनांक १२/०८/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१९१५०७५५५५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.09.04 15:00:48 +05'30'

**(राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग(का-१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प)/व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.

